



आंद्रेई नेक्रासोव

# मित्रमंडळी

वेगवेगळ्या सोविएत
प्रजासत्ताकांमधील
मुलांसंबंधीच्या चित्रकथा

प्रगती प्रकाशन  मॉस्को





आंद्रेई नेक्रासोव

# मित्रमंडळी

वेगवेगळ्या सोविएत
प्रजासत्ताकांमधील
मुलांसंबंधीच्या चित्रकथा

प्रगती प्रकाशन  मॉस्को





त्याचे काय झाले की, सोविएत समाजसत्तावादी प्रजासत्ताक संघाची राजधानी असलेल्या मॉस्को शहरामधल्या एका गजबजलेल्या रस्त्यावरच्या एका शाळेतल्या विद्यार्थ्यांना कुतूहल वाटायला सुरुवात झाली—आपल्या अफाट देशामधल्या इतर प्रदेशातली मुले कशी आहेत? ती कशी राहतात, त्यांचे मूळ प्रदेश कशासाठी प्रसिद्ध आहेत? तेव्हा मॉस्कोतल्या मुलांनी पत्रे पाठवायला आरंभ केला—वेगवेगळ्या प्रजासत्ताकांना, प्रदेशांना, मोठ्या शहरांना आणि छोट्या खेड्यांना, सोविएत रशियाच्या चारही दिशांना.



देशाच्या केंद्रापासून सीमेवरच्या प्रदेशांपर्यंत त्या पत्रांनी उड्डाणें केली.

आणि हे सोविएत संघाचे केंद्र – मॉस्कोतला लाल चौक.

लेनिन समाधीवरचा पहारा बदलतो. क्रेमलिनच्या घंटा तासाचे टोल देतात – ही मॉस्को वेळ मानली जाते. स्पास्की मनोऱ्यावरच्या घड्याळामधील वेळेनुसार आमच्या देशातल्या सर्व कोपऱ्यांमधली घड्याळे लावली जातात. आर्क्टिक सागरामधल्या आणि अंटार्क्टिकमधल्या ध्रुवावरच्या मोहीमा मॉस्को वेळेप्रमाणे आपली घड्याळे लावतात, तसेच गागारीनच्या पावलांवर पाऊल ठेवून अंतराळात भ्रमण करणारे अंतराळवीरही मॉस्को वेळेनुसार चालतात.

प्रश्नांनी सामावलेली मुलांची पत्रे भरारी घेऊन उडाली. आणि लौकरच उत्तरे यायला सुरुवात झाली.



आमच्या चुकोत्कामध्ये हिवाळ्यात खूप बर्फ पडतो, समुद्र गोठून जातो आणि अनेक महिनेपर्यंत सूर्य उगवत नाही. थिजलेल्या आकाशात फक्त तारे चमकत असतात आणि कधी उत्तर ध्रुवावरची प्रभातकिरणे उजळतात.



चुकोत्कामधले हवामान फार कडक आहे असे म्हणतात. ते खरे आहे आणि पूर्वी इथले आयुष्य फार कठीण होते. हरणाच्या कातड्याच्या तंबूमध्ये, वरंगामध्ये, वातीच्या दिव्यांच्या उजेडात हिवाळ्याचे दिवस कसे काढले, त्याच्या आठवणी आमची म्हातारी माणसे अजून सांगतात. पण आज मात्र आम्ही चांगल्या घरांमध्ये राहतो, चांगल्या शाळेत जातो व अणुशक्ती केंद्राकडून आम्हाला वीजपुरवठा होतो. घरांमध्ये ऊब राखण्यासाठीही या केंद्राकडून उष्णता पुरविली जाते.

उन्हाळ्यात तुंद्राला फुलवा येतो. त्यावेळी सूर्य कधीच मावळत नाही. मग आम्ही वारंवार समुद्र किनाऱ्यावर सहली काढतो. काहीवेळा आमचे नशीब जोरावर असले, तर एखाद्या हिमखंडावर आम्हाला सील मासे आणि त्यांची पिल्ले पहायला मिळतात. तुम्हाला भेट म्हणून ध्रुवावरच्या अस्वलाचा छावा पाठविण्याचा आम्ही विचार केला होता, पण ध्रुवावरची अस्वले आणखी उत्तरेला, उत्तर ध्रुवाच्या अगदी जवळ राहतात.

युरोपीय रशियाच्या जंगलांच्या भागात आम्ही राहतो. आमच्या जंगलांमध्ये खूप अळंब्या आणि बेरी फळे सापडतात. आमचा प्रदेश कारागिरांसाठी प्रसिद्ध आहे. तुम्ही कधी 'मात्र्योष्का' बाहुली पाहिलीय? आमच्या इथून ती सबंध जगभर प्रसिद्धी पावलीय. तुम्ही ती बाहुली उघडलीत तर तिच्या आत अगदी तिच्यासारखीच, पण आकाराने थोडी छोटी बाहुली तुम्हाला सापडेल. तिच्या आतमध्ये तिच्यापेक्षा छोटी आणखी एक बाहुली असेल आणि अशा प्रकारे तुम्ही अगदी छोटयातल्या छोटया बाहुलीपर्यंत पोचाल. ही सर्वांत छोटी बाहुली हाताच्या बोटाच्या नखाएवढया आकाराची असू शकते, तर सर्वांत मोठी बाहुली एक वर्षाच्या बाळाएवढी असू शकते.



योग्य प्रकारचे लाकूड कसे निवडायचे, ते कसे वाळवायचे आणि ते तासून मात्र्योष्का कशी रंगवायची, याची आमच्या कारागिरांना उत्तम माहिती आहे. आमच्या देशामधल्या आणि परदेशांमधल्या अनेक पदार्थवस्तुसंग्रहालयांमध्ये तुम्हाला त्यांच्या हस्तकलेचे नमुने पहायला मिळतील.

आम्हीसुद्धा 'मात्र्योष्का' बनवायला शिकतो. आमच्या वडिलांप्रमाणे आणि आजोबांप्रमाणे, आम्हालाही कारागीर बनायची इच्छा आहे. मात्र्योष्कांशिवाय, आमच्या खेडयात लाकडी पेटया बनवतात. आम्हीसुद्धा काही पेटया बनवून त्या रंगवल्या आहेत. त्यात खूप गंमत येते आणि ते काम शिकणे अवघड नाही. आमच्या खेडयात या, मग आम्ही तुम्हालाही शिकवू.

आमचे अबाकान शहर सैबेरियामधल्या येनीसेई नदीकाठी वसले आहे. खाकास्सिया भाषेत त्याचा अर्थ "अस्वलाचे रक्त." जुन्या काळी येथे खरोखरीच अस्वलांची वस्ती असलेले निबिड अरण्य होते. पण आज जगभरचे लोक आमच्या गावाच्या जवळच असलेल्या शूशेन्स्कोये खेड्याला भेट द्यायला येतात. लेनिन यांनी हद्दपारीचा काही काळ येथे घालवला. त्यांच्या स्मृतीला वंदन करायला ती माणसे येतात.



सध्या बांधत असलेले सयानो-शूशेन्स्कोये जलविद्युत् केंद्र हे लेनिन यांचे प्रचंड स्मारक ठरेल. येथून जेव्हा वीज निर्माण होऊ लागेल तेव्हा सैबेरियात अधिक कारखाने, मोठे रस्ते व सुंदर शहरे उभारली जातील.

धातू ओतणाऱ्या कामगारांच्या नगरवस्तीत युक्रेनमध्ये आम्ही राहतो. आमच्यातला प्रत्येकजण थोडासा ओतारी आहे. तसेच सर्व मुलांप्रमाणे, आमच्यातला प्रत्येकजण थोडा संशोधक आहे. म्हणून काही दिवसांपूर्वी, दोनशे किलोमीटर दूर असलेल्या एका ठिकाणी आम्ही सहल काढली.

आमचा रस्ता स्तेपमधून जात होता. प्राचीन काळात, सीथीयन नांवाची महाभयंकर भटक्या योद्धयांची जमात या स्तेपवरून वेगाने दौडत जायची. या अफाट मैदानात त्यांच्या थडग्यांचे ढीग अजूनही अधूनमधून दृष्टीला पडतात. एका ठिकाणी रस्त्याच्या बाजूला एक दगडी मूर्ती आम्ही पाहिली. ती मूर्ती तिथे कुणी आणि कशाला ठेवली असावी? कुणालाही याचे उत्तर माहीत नाही. सीथीयनांचा काळ फार फार पूर्वीच लोटून गेलाय आणि त्यांच्या वेळेपेक्षा स्तेपमध्ये खूप मोठे बदल घडून आलेत.



आमच्या सहलीत आम्ही सर्वांत मनोरंजक ठिकाण पाहिले ते अस्कानिया-नोवा अभयारण्य. तिथे खुल्या स्तेपमध्ये ईम्यू शहामृग पक्षी, झेब्रा, हरणे आणि इतर परदेशी प्राणी वावरत होते. प्रश्न पडतो की आपण आपल्या स्वतःच्या युक्रेन-मध्ये आहोत, का कदाचित आफ्रिकेत किंवा ऑस्ट्रेलियात आहोत?



आम्ही इथे नेहमी रहात नाही. थोडे दिवस राहण्यासाठी आम्ही या ठिकाणी आलोय. ऊबदार काळ्या सागराच्या किनाऱ्यावर वसलेल्या आर्तेक बालवीर छावणीत सोविएत संघाच्या सर्व भागांमधून आणि परदेशामधूनही मुले रहायला येतात. आमचा इथे फार छान वेळ चाललाय. आम्हाला खूप नवे मित्र मिळाले आहेत, संध्याकाळच्या वेळी आम्ही शेकोटयांभोवती बसतो, जगातल्या अनेक भाषांमधली गाणी म्हणतो, नाचतो आणि जातो. खेळ खेळतो. आमचा स्वत:चा छोटासा जहाजांचा काफलाही आहे.

आर्तेकमधल्या समुद्राला काळा म्हणतात, पण प्रत्यक्षात तो गर्द निळा आणि खूप ऊबदार आहे. काही वेळा डोल्फिन माशांचा पाण्यातला खेळ पहायला आम्ही लॉंचमधून जातो.

जेव्हा आम्ही आपापल्या गावांना जाऊ तेव्हा आमच्याबरोबर आर्तेकचे गाणे घेऊन जाऊ:

गर्द निळे आकाश येथे,
लाटा गाणी गाती जेथे.
एकदाच जो राहील,
आठवणी कधी न विसरील.
पर्वतशिखरे उत्तुंग उंच
उजळती ज्वाला उंच उंच
आर्तेक! आर्तेक! आर्तेक!

हे गाणे आमची मैत्री जागती ठेवील.



जुन्या काळी श्वेतरशिया हा तेथील दुर्गम वाटांसाठी, घनदाट अरण्यांसाठी आणि महाप्रचंड गव्यांसाठी – रानबैलांसाठी – मुख्यतः प्रसिद्ध होता.

आता दलदल सुकविण्यात आली आहे, नांगरून जमीन साफ करण्यात आली आहे व अनेक रस्ते बांधण्यात आले आहेत. पण ते सारे जमिनीच्या एका पट्ट्याला वळसा घालतात. बेलोवेझस्काया पूश्चा हे राखीव अरण्य आहे आणि तिथे गवे स्वैर संचार करतात. आम्ही तेथे खूप वेळा गेलो आहोत. गव्यांच्या जीवनाचा अभ्यास करणाऱ्या प्राणीशास्त्रज्ञांना आम्ही मदत करतो. काही वेळा तर छोट्या गव्यांना लुसलुशीत कोवळ्या गवताचे घास चारतो. जे जे आम्ही पाहतो, त्या त्या सर्व गोष्टींची आमच्या दैनंदिनींमध्ये नोंद ठेवतो.

आता आमचे प्रजासत्ताक आणखी एका गोष्टीसाठी प्रसिद्ध आहे – प्रचंड बेलाझ सरकत्या लॉऱ्यांसाठी! आमच्या प्रजासत्ताकाची राजधानी मिन्स्क येथील कारखान्यात त्या तयार होतात. या लॉऱ्या सर्व सोविएत संघात, मध्य आशियापासून स्पिटस्बर्जेनपर्यंत काम करतात; तसेच आशिया व आफ्रिकेतही काम करतात. लॉरीच्या रेडिएटरवर बळकट गव्यांची छोटी आकृती बसवलेली असते. त्या आकृतीवरून आमची श्वेतरशियन सरकती लॉरी जगात कुठेही ओळखता येते.







आमचे उझ्बेकिस्तान प्रजासत्ताक कापूस पिकवते. तसे अनेक शतकांपासून ते कापसाची लागवड करते आहे, पण क्रांतीपूर्वी आमच्या "पांढऱ्या सोन्या" वर बाय – जमीनदार – श्रीमंत बनत होते, तर प्रत्यक्षात कापूस पिकवणाऱ्या शेतकऱ्यांच्या अंगावर फाटके कपडे असायचे. असे म्हणतात की, प्राचीन उझ्बेकिस्तानात कापूस पिकवणाऱ्या शेतकऱ्यांना साखळदंड बांधलेले असत. सोविएत सत्तेने बायना हाकलून दिले आणि जमीन शेतकऱ्यांच्या ताब्यात दिली. कापसाच्या शेतांना पाणीपुरवठा करायला नवे कालवे खोदले आणि आमची भूमी अधिक तरुण व आनंदी बनली. कापसाची वेचणी सुरू होते तेव्हा सारेजण शेतांवर काम करायला जातात. आम्ही शाळकरी मुलेसुद्धा कापूस वेचायला मदत करतो.

आमची भूमी खूप प्राचीन आहे. वास्तुशिल्पीय स्मारकांसाठी प्रसिद्ध आहे. जुन्या मशिदी, मदरसे, वेधशाळा, कबरी आणि राजवाडे यांचे यांचे सरकार रक्षण करते. या जुन्या इमारतींचे सौंदर्य पहायला जगाच्या कानाकोपऱ्यांमधून माणसे येतात. आम्ही सर्व पाहुण्यांचे स्वागत करतो. आमच्या भूमीला येऊन पहा. कितीतरी गंमतीदार गोष्टी आम्ही तुम्हाला दाखवू.



अनेक शतके आमचे भटके पूर्वज कझाखस्तानच्या स्तेपमधून ताऱ्यांच्या साहाय्याने मार्ग शोधीत फिरत राहिले. दूरदूरच्या सफरी करायला ते घाबरत नसत. त्यामुळे, आमच्या स्तेपभूमीतून, जगातले पहिले अंतराळवीर यूरी गागारीन यांनी अनंत अंतराळात पहिली भरारी घेतली, हे अगदी योग्यच होते. जुनी माणसे सांगतात की, निकितिन नांवाच्या कुणा माणसाने शंभर वर्षांपूर्वी चंद्रावर जाण्यासंबंधी धर्मबाह्य गोष्टी बोलल्याबद्दल, झारने त्याला राजधानीमधून हद्दपार करून बैकानूरला पाठवले होते. आहे की नाही विनोद? अंतराळयानांना उड्डाण करायला हीच जागा पुढे निवडण्यात येणार होती हे जर झारला त्यावेळी समजले असते तर? (आता बैकानूर अंतराळयानतळ सर्व जगाला माहीत आहे.) आम्हाला अंतराळवीर म्हणून खेळायला आणि अजून न शोधलेल्या जगांच्या सहली कल्पनेने करायला खूप आवडते.

जुन्या काळी कझाखांना फक्त एकच रस्त्यावरून जायचे माहीत होते—धुळकट स्तेपमधून गुरांचे कळप हाकलीत न्यायच्या. आता तिथे अनेक रस्ते आमच्यासाठी खुले झालेत.

जर तुम्ही जमिनीची मनोभावे मशागत केलीत तर ती तुम्हाला गव्हाचे सुरेख पीक, छान कोळसा आणि अल्मा-अताची भलीमोठी सफरचंदे देते.



आमचे प्राचीन महान कवी शोता रुस्तावेली यांनी आमच्या जॉर्जियाची कीर्ती सगळीकडे पसरवली. प्रत्येक जॉर्जियन माणसाला त्याच्या प्राचीन देशाचा, त्याच्या इतिहासाचा अभिमान वाटतो. पण आजच्या स्वतंत्र प्रजासत्ताकातल्या – प्राचीन आणि तरुण अशा दोन्ही गुणांनी युक्त असलेल्या, समान दर्जा असलेल्या प्रजासत्ताकांमधले एक प्रजासत्ताक असलेल्या – आजच्या सरदारांच्या भव्य करामतीं-पुढे प्राचीन स्मारके आणि हिमाच्छादित पर्वतशिखरेही झुकतात.

हे सरदार म्हणजे आमचे आई-बाप, सामान्य सोविएत माणसे, फळबागा लावणारे, शास्त्रज्ञ, कोरीव धातूकाम करणारे, मोटारी बनवणारे, नर्तक आणि खलाशी. रुस्तावेलीच्या ओळींमध्ये आमच्या कवींनी नवी सूर्यकिरणे मिसळली आणि ती आता नव्या पिढ्यांच्या हाती सोपवीत आहेत. जॉर्जियाचे वर्णन करायला शब्द अपुरे पडतील. सर्वांत उत्तम गोष्ट म्हणजे खुद्द इथे येऊन आपल्याच डोळ्यांनी आमची सुंदर भूमी पहा. तुम्ही रमणीय स्थळे पहाल, ऊबदार समुद्रात डुंबाल आणि इथल्या प्रसिद्ध पाहुणचाराचा आनंद लुटाल.







आम्ही कास्पियन सागराशेजारी अझरबैजानमध्ये राहतो. आमच्या सागराला चारी बाजूंनी जमिनीचा वेढा पडला आहे, पण तरी त्याच्यात सागरगामी बोटी संचार करतात आणि आमची तुफाने कोणत्याही महासागरातल्या तुफानांच्या तोडीची असतात. तसे आम्ही दक्षिण अक्षांशांमध्ये आहोत, पण हिवाळ्यात उत्तरेप्रमाणे आमच्या समुद्रावर बर्फाचा थर बसतो आणि हिमखंडांवर सील मासे दिसतात. आमच्या समुद्रात सुरेख मासळी सापडते: उदाहरणार्थ, मीनोगा नांवाची मासळी तुम्ही जर सुकवलीत तर मेणबत्ती-प्रमाणे जळते, तसेच बेलुगा माशाचे वजन काही वेळा एक टनापर्यंत भरते.



बाकू या आमच्या राजधानीपासून दूर समुद्रात तेलविहीरींची रांग उभी राहिलेली दिसते. अझरबैजान अनेक देशांना तेलाचा पुरवठा करते आणि सागराच्या तळापासून तेल उपसून काढण्यात आमचे तेलकामगार फार कुशल आहेत.

आता कदाचित तुम्हाला बेर्बेरोव कुटुंबाविषयी माहिती हवी असेल. बेर्बेरोव कुटुंबाने लहानाचा मोठा केलेला किंग नांवाचा सिंह प्रसिद्ध चित्रपटतारा बनला. पण दुर्दैवाने एका अपघातात किंग मरण पावला. आता बेर्बेरोव कुटुंब सिंहाच्या छाव्यांना वाढवीत आहे. बेर्बेरोव कुटुंबातल्या मुलांचा आम्हाला सर्वांना फार हेवा वाटतो. आपला स्वतःचा पाळलेला सिंह असणे कुणाला आवडणार नाही? पण आमचे पालक म्हणतात की, वाघ-सिंह पाळणे ही फार कटकटीची बाब आहे तेव्हा कुत्र्या-मांजरांवरच आम्ही आमची हौस भागवून घेतली पाहिजे.

पूर्वीच्या काळी लिथुआनियामधील कोळयांना छोटया डोलकाठी गलबतांमधून जावे लागे आणि किनाऱ्याच्या जवळपास रहावे लागे. आज मोठ्या मच्छीमारी बोटी दूर बाल्टिकमध्ये आणि उत्तरेच्या सागरांपर्यंत जातात, काही तर अटलांटिक महासागरात जातात. या मच्छीमारी मोहीमांवरून परत येताना आमचे वडील आमच्यासाठी पागलेले मासे, चक्राकार मासे आणि सुंदर शिंपले आणतात. पण आमच्या बाल्टिकमध्ये स्वत:ची अद्भुत भांडारे आहेत – सूर्यकांतमणी, अंबर. दररोज सकाळी, लाटांनी वाहून आणलेले त्यांचे छोटे छोटे तुकडे किनाऱ्याला सापडतात.

काही दिवसांपूर्वी आम्ही काऊनसला गेलो होतो. तिथे आम्ही चियर्लिंओनिस चित्रसज्जामध्ये गेलो होतो. चियूर्लिंओनिस हे फार मोठे गृहस्थ होते आणि आमच्या राष्ट्रिकाला त्यांचा फार अभिमान वाटतो; ते अभिजात चित्रकार आणि संगीतकारही होते. काऊनसला जाताना वाटेवर आम्ही अनेक सुंदर सरोवरे पाहिली. आमच्या देशात खूप सरोवरे आहेत आणि जुन्या किल्ल्यांचे भव्य अवशेष आहेत.

आपल्या झगमगीत खिडक्यांमधून सुंदर आधुनिक गाळ्यांची घरे अनेकदा या जुन्या अवशेषांकडे पहात असतात. ही नवी घरे आमच्या वडिलांनी आणि मोठ्या भावांनी बांधली आहेत, तसेच कारखाने व विद्युत केंद्रे त्यांनी बांधली आहेत. आम्ही भावी काळातली नगरे उभारू.





शरद ऋतूहा मोल्दावियामधील सर्वांत सुंदर काळ. तिथे एवढी सफरचंदे होतात की, त्यांच्या भाराने फांद्या वाकतात व त्यांना आधार द्यावा लागतो. आम्ही द्राक्षे, पेअर, जर्दाळू आणि आलुबुखार यांचीही पैदास करतो. मॉस्कोत तुम्हाला आमच्या फळांशी चांगलीच ओळख असणार.

शरद ऋतूहा आमचा मोठा कामाचा काळ. याचा अर्थ हिवाळयात किंवा उन्हाळयात आम्ही विशेष स्वस्थ बसून राहतो असा नव्हे. आम्हा सर्व मुलांना विमानांच्या प्रतिकृती बांधण्याचा खूप नाद आहे आणि विमानांच्या तऱ्हेतऱ्हेच्या नमुन्यांना तयार करण्यात व स्पर्धांत भाग घेण्यात ती नेहमी गुंतलेली असतात. आणि मुलींना गाणी म्हणायला व नाचायला आवडते. सर्वसाधारणपणे आम्ही मोल्दावियाचे लोक संगीतप्रेमी आणि उत्सवप्रेमी आहोत. शरदामध्ये फळवेचणी संपल्यानंतर, जिकडे जाल तिकडे तुम्हाला संगीत, गाणी आणि हसणे-खिदळणे ऐकायला येईल. आणि जेव्हा नाचणे सुरू होते तेव्हा जमीन हादरते.

शरद ऋतूमध्ये मोल्दावियाला जरूर या. आम्ही तुम्हाला सफरचंदांची आणि द्राक्षांची मेजवानी देऊ व तुमच्यासाठी नाच-गाणी करू.

दौग्वा नांवाची एक मोठी नदी रीगाच्या आखातामध्ये जेथे मिसळते तेथे तिच्या किनाऱ्यावर आमचे शहर वसले आहे. प्रत्यक्ष रीगा शहर समुद्राच्या फेसामधून जन्माला आले आहे, असेसुद्धा तुम्ही म्हणू शकाल.

हे फार सुंदर शहर आहे आणि म्हणूनच कदाचित आम्ही सर्व सौंदर्याचे वेडे आहोत. आमच्या शाळेतली सारी मुले चित्रे काढायला व रंगवायला शिकतात. त्याशिवाय लात्वियाच्या लोकांना कवितेची आणि गाणी म्हणण्याची फार आवड आहे. वार्षिक गीत उत्सवासाठी मच्छीमारसुद्धा घाईघाईने सागरावरून परत येतात. आमचे महान कवी जानिस रेनिस यांच्या आठवणीदाखल, रीगामध्ये दरवर्षी एक कविता-दिन साजरा होतो.



जर तुम्ही रीगाला आलात तर आम्ही तुम्हाला आमच्या घुमटच्या कॅथेड्रलमध्ये तिथला प्रसिद्ध ऑर्गन ऐकायला घेऊन जाऊ; तसेच क्रीडा प्रासादात हॉकी किंवा बास्केटबॉलची मॅच पहायला नेऊ. दरम्यान, तुमच्या बहुतेकांच्या घरांमध्ये रीगात बनवलेली शीतकपाटे किंवा व्हेफ ट्रन्झिस्टर सेट असतील. लात्वियाची राजधानी असलेल्या रीगाची त्या वस्तू आठवण करून देतील.





आमच्या किर्घिज घोड्यां एवढ्या वेगाने धावणाऱ्या घोड्यांची पैदास करणारी आणि घोडदौड हा राष्ट्रीय खेळ असलेली अशी स्थळे या जगात फार थोडी शिल्लक राहिली आहेत. बहिरीससाण्याच्या साह्याने शिकार करण्याचा खेळ तर फक्त किर्घिझियामध्ये उरला आहे.

कल्पना करा की घोडेस्वार डोंगरपठारावरून बेफाम दौडत चालला आहे, त्याची नजर आकाश धुंडाळतेय. त्याच्या हातावर शिकवलेला बहिरीससाणा बसला आहे व त्याच्या डोक्यावर कुंची पांघरलेली आहे. घोडेस्वार जेव्हा एखादे बदक किंवा आकाशात एखादे तितर पाहतो, तेव्हा तो कुंची काढतो व बहिरीससाणा सावजावर झडप घालायला भरारी घेतो.

आज डोंगरमाथ्यांवर गरुडांच्या जोडीने हेलिकॉप्टर भिरभिरत असतात आणि डोंगराळ रस्त्यांवरून दणदणीत ट्रक मोटारी पळत असतात. पण फक्त घोडा जाऊ शकेल असे अरुंद रस्ते अजूनही आहेत. भूगर्भशास्त्रज्ञांची आणि भूमापनशास्त्रज्ञांची घोडा प्रामाणिकपणे सेवा बजावतो. धनगरांचा तो सच्चा सेवक आहे. आणि पाणिदार वळू घोड्यावरून चौखूर दौडण्याइतका किर्घिज मुलाला दुसरा कशानेही आनंद होत नाही.



आमचा तुर्कमेनिया नैसर्गिकदृष्टचा खूप श्रीमंत आहे. आमच्याकडे डोंगर आहेत, खोरी आहेत, स्तेप आहेत आणि समुद्रही आहे. सुंदर लोकरीच्या मेंढ्यांचे कळप डोंगरकुरणांमध्ये चरतात, शेतांमधून भरघोस पिके येतात, आमचे मच्छीमार भरपूर मासळी पकडून आणतात. आणखी एक मौल्यवान वस्तू तुर्कमेनियाजवळ आहे—पूर्वीच्या आणि उद्याच्या काळाबद्दलची सुंदर गाणी!



पूर्वीच्या काळच्या योद्ध्यांचा पराक्रम वर्णन करणारी जुनी गाणी म्हातारी माणसे जेव्हा आमच्यापाशी गातात, तेव्हा नव्या तुर्कमेनियात उद्या आम्ही गाजवणार असलेल्या पराक्रमांची स्वप्ने आम्हाला डोळ्यांसमोर दिसत असतात.

सोविएत सत्ता सुरू झाल्यापासून आमच्या लोकांनी अनेक वैभवशाली कामगिऱ्या पार पाडल्या आहेत. पूर्वी शेतात केत्मेन-नांगर-होते, त्यांच्या जागी आता ट्रॅक्टर आले आहेत. खडकाळ ताकीर वाळवंटामधून पूर्वी उंटांचे काफले रखडत जायचे, आज आधुनिक महामार्गांवरून वेगाने मोटारी धावतात. आमच्या भूमीवर नवी शहरे आणि नवे कारखाने उभे झालेत. पण उजून खूप काही करायचे शिल्लक आहे—वाळवंटाच्या चारी कोपऱ्यांना पाणी खेळवायचे आहे, सरकत येणाऱ्या वाळूचे आक्रमण थोपवायचे आहे, आमच्या भूमीचे एका प्रचंड नंदनवनात रूपांतर करावयाचे आहे. त्यासाठी आम्ही अभ्यास करतोय—ही मोठी कामे पार पाडायला!

दगडधोंडयांनी विखुरलेले डोंगरउतार साफ करून त्यांचे द्राक्षाच्या मळयांमध्ये रूपांतर करायला आमच्या पूर्वजांना अनेक हजार वर्षे लागली. आज आर्मेनियात बनवलेली दारू सबंध जगात प्रसिद्ध आहे.

आमच्या शास्त्रज्ञांनी स्वतः बांधलेली वेधशाळा डोंगरात एवढया उंचावर आहे की, डोंगरवाटांवरून केवळ पायी जाऊनच तेथे पोचता येते. आमच्या खगोलशास्त्रज्ञांच्या मताला सारे जग मान देते.

अनादी काळापासून आमच्या डोंगरांमधून सोने आणि चांदी काढली जातात. आर्मेनियाचे अलंकार देशाच्या सीमांपलिकडे प्रसिद्ध आहेत.

आर्मेनियाची माणसे उद्योगी आहेत, पण आम्हाला गंमत करायलाही आवडते. गाणी, नाच आणि संगीत यांच्याविना आम्ही जगू शकत नाही. आणि आम्ही उत्तम कसरतपटू आहोत. आर्मेनिया ही प्राचीन संस्कृतीची, चित्रकलेची, वास्तुशिल्पाची, संगीताची भूमी आहे. आजचा आर्मेनिया ही शास्त्रज्ञांची भूमी आहे. पृथ्वीच्या कोणत्याही भागात आर्मेनिया हे नांव ओळखले जाते.



आमच्या भूमीला "जगाचे छप्पर" म्हणतात. ताजिकीस्तानचा जवळ जवळ सारा प्रदेश डोंगराळ आहे. आमच्या काही खेड्यांना तर हेलिकॉप्टरनेसुद्धा नेहमीच पोचता येते असे नाही. पण तरीसुद्धा पीआंज नदीवरच्या आमच्या छोट्या गावातले आयुष्य मोठे गंमतीदार आहे. नदीच्या पलिकडे अफगाणिस्तान पसरले आहे. सीमा रक्षकांबरोबर आमची मैत्री आहे आणि त्यांच्या ठाण्यांवर जाऊन अनेकदा आम्ही त्यांना भेटतो. डोंगरी वनस्पती उद्यानाला भेट द्यायलाही आम्हाला आवडते आणि दुर्मीळ वनस्पतींची वाढ करायला वनस्पतीशास्त्रज्ञांना आम्ही मदत करतो. आमची सर्व मुले तरबेज घोडेस्वार आहेत आणि मुली सुंदर कशिदाकाम करतात व गालिचे विणतात.

काही दिवसांपूर्वी साप पकडणारे काही लोक आमच्या गावी आले होते. सापांच्या विषामध्ये औषधी गुणधर्म असल्याने साप फार उपयुक्त असतात, असे त्यांनी आम्हाला सांगितले. तेव्हापासून साप मारणे आम्ही बंद केले.





आम्ही ताल्लिनमध्ये राहतो. ही एस्तोनियाची राजधानी आणि फार पूर्वीपासूनचे सागरी बंदर. शहराच्या जुन्या मध्यभागाभोवती आता नवीन घरांच्या वस्त्या उभ्या झाल्या आहेत. ही नवी घरे सुरेख आहेत; पण तरीही, जुन्या ताल्लिनचे अरुंद रस्ते, प्राचीन गुदामे, प्रार्थनामंदिरे आणि छपरावर वायुदर्शक यंत्र बसवलेला प्रसिद्ध टाऊन हॉल, आम्हाला जास्त आवडतो. समुद्रकिनाऱ्यावरचे पीरीता हे आमचे आणखी एक आवडते ठिकाण. तिथे आमचा स्वतःचा शर्यतीच्या बोटींचा क्लब आहे. उंच फळीवरून सूर मारून तिथे आम्ही पोहतोसुद्धा. पण शिडाच्या होडीत बसून सफर करायला आम्हाला सर्वांत जास्त आवडते. ऑप्टिमिस्ट नांवाच्या अगदी छोट्या बोटींमधून आठ वर्षांची मुलेसुद्धा भटकतात. त्यांच्यापेक्षा मोठ्या वयाच्या मुलांना थोडे दूर उपसागरात जायची परवानगी आहे. आमच्या बोटी आम्हीच दुरुस्त करतो आणि दोरखंडे, कप्प्या, नांगर यांची व्यवस्था पाहतो. शाळेनंतर आमच्यापैकी बरेच जण नौकानयन विद्यालयात जाऊ इच्छितात.

अशी पत्रे मॉस्कोत आली.





अर्थात या पुस्तकात सर्व पत्रे छापणे शक्य नाही. पण मॉस्कोतल्या शाळकरी मुलांनी आलेल्या प्रत्येक पत्राला उत्तर पाठवले. अशा प्रकारे पत्रव्यवहार सुरू झाला. काही मुलांनी आपल्या पत्रांबरोबर चित्रेही पाठवली.



मॉस्कोत नव्या वर्षाचा उत्सव कसा साजरा करतात याबद्दल अनेक पत्रांमधून विचारणा झाली होती. मॉस्कोतल्या प्रत्येक मुलाला अर्थातच याबद्दल खूप काही माहिती असते. मॉस्कोतल्या उत्तम संगीत मैफलींच्या सभागारांमध्ये मोठी नववर्षाची झाडे लावलेली असतात आणि दोन आठवडे-पर्यंत हा उत्सव साजरा होत असतो.

या उत्सव समारंभांना लक्षावधी मुले येतात. हिम-आजोबा आणि हिमसुंदरी प्रत्येक मुलाला भेटवस्तू देतात. चमकणाऱ्या देवदारांच्या झाडांभोवती मुले फेर धरून नाचतात, खेळतात. कसरतपटू, नट, जादुगार मुलांसाठी प्रयोग करतात किंवा मुले स्वतःच कवितावाचन करतात, गाणी म्हणतात आणि नाच करतात. या समारंभांना खूप मजा येते.





सेर्गेई अब्रात्सोव यांच्या केंद्रीय कठपुतळी थिएटरबद्दल खूप प्रश्न विचारण्यात आले.

हे खरोखरच फार वैशिष्ट्यपूर्ण थिएटर असून सबंध जगभर प्रसिद्ध आहे.

मॉस्कोवासी निदान एवढे सुदैवी आहेत की, थिएटरच्या दर्शनी भागावरील "जादूचे घड्याळ" ते पाहू शकतात. तिथे दर तासाला कठपुतळ्या गंमतीदार प्रसंग करून दाखवतात. पण अब्रात्सोव यांच्या थिएटरचे तिकीट मिळवणे फार अवघड. अब्रात्सोव यांच्या बाहुल्या पहायची प्रत्येकाला इच्छा असते आणि मॉस्कोत दर दिवशी जवळ जवळ दहा लाख प्रवासी येतात.

मॉस्कोत सर्कस आहे आणि मुलांसाठी नाटचगृहे आहेत. सर्व काही मुलांकडून केले जाते अशाही काही नाटचसंस्था आहेत. तीच नट असतात, वाद्यवादक असतात, रंगभूषाकार असतात, दिग्दर्शक असतात आणि नाटककारही असतात. बालवीर संस्था, शाळा आणि मोठ्या कला केंद्रांमार्फत अशा नाटचसंस्था चालविल्या जातात.









ऊष्ण हवामानाच्या अश्खाबादहून मुलांनी पत्र पाठवून विचारले, "खुल्या जागेत तुम्ही बर्फावर स्केटिंग करीत असल्याचं आम्ही टेलिव्हिजनवर पाहिलं. जेव्हा बर्फ वितळतो तेव्हा काय होतं?"

मॉस्कोतल्या मुलांनी त्यांना उत्तर पाठवले. "मॉस्कोत मुलांची खूप क्रीडा विद्यालयं आहेत. या विद्यालयांमध्ये • व्यायामशाळा आहेत, हिवाळी पोहण्याचे तलाव आहेत आणि कृत्रिम बर्फाची स्केटिंगची रिंगणे आहेत. तेव्हा हिवाळ्यात आम्ही पोहू शकतो आणि उन्हाळ्यात बर्फावर स्केटिंग करू शकतो किंवा हॉकी खेळू शकतो."

मोल्दावियाच्या मुलांनी विचारले: "तुम्हाला नाचायला आवडतं?"

मॉस्कोतल्या मुलांनी मोल्दावियाला लिहिले की, बालवीर प्रासादांमधले नृत्यकलेचे विभाग मुलांना केवळ लोकनृत्येच शिकवीत नाहीत, तर नृत्यकलेले धडेही देतात. या नृत्यपाठांना जाणारी अनेक मुले पुढे बॅले स्टुडिओमध्ये जातात.

मॉस्कोतल्या बालवीर प्रासादाबद्दल अनेक प्रश्न विचारण्यात आले होते. या प्रासादाचे संपूर्ण वर्णन करणे अशक्य आहे, असे मॉस्कोच्या मुलांचे मत बनले.

तेव्हा ती सोबत कॅमेरे घेऊन प्रासादामध्ये गेली व अंतराळस्थानकाची खेळण्यातली प्रतिकृती, बालकलाकारांचा एक धडा, व्यायामशाळा, कठपुतळ्या नाचवणारे बाल कलाकार, यांची त्यांनी छायाचित्रे घेतली.

या छायाचित्रांच्या त्यांनी चिक्कार कॉपी काढल्या आणि आपल्या मित्रमंडळींच्या हजारो पत्यांवर पाठवून दिल्या.





पामीरहून एक पत्र आले. “मॉस्कोत तुम्ही श्वासोच्छ्वास कसा करू शकता?” ताजिक मुलांनी विचारले होते. “तुमच्याकडं रस्त्यांवर इतक्या मोटारी पळतात की, हवेत खूप काजळी आणि धूर असणार. त्यामुळं झाडं आणि गवत सुकून जात नाही का?”

त्यावर मॉस्कोच्या मुलांनी उत्तर दिले की, सर्व मोठ्या शहरांमध्ये मॉस्कोत सर्वांत स्वच्छ हवा आहे. आणि आमच्या नळांचे पाणी सर्वांत शुद्ध आहे. दुतर्फा झाडांच्या रांगा असलेल्या रस्त्यांवर आणि हिरवळींवर पिवळी फुलझाडे फुलतात व प्रत्येक अंगणात फुलांचे ताटवे असतात. सबंध मॉस्कोभोवती झाडांच्या गर्द राया आहेत. काही वेळा लहान सांबरे चुकून रस्त्यांवर येतात. या जंगलच्या पाहुण्याला रहदारीच्या रस्त्यांवर दुखापत होऊ नये म्हणून काळजी घेता घेता, रहदारीवरच्या पोलिसांच्या काही वेळा नाकी नऊ येतात.

## वाचकांना

'सूर्य सदा तळपत राहो' ही सचित्र बालपुस्तकमाला 'प्रगती प्रकाशन' या पुस्तकापासून सुरू करीत आहे. सोविएत संघातल्या वेगवेगळ्या प्रजासत्ताकांमध्ये राहणाऱ्या मुलांविषयी या पुस्तकात माहिती दिली आहे. सोविएत मुले-मुली कशी राहतात, त्यांच्या आवडी-निवडी काय आहेत, त्यांची करमणुकीची साधने कोणती आहेत, याबद्दल जगभरच्या मुलांना यातून माहिती मिळेल. सोविएत मुलांना काय आवडते आणि काय आवडत नाही, त्यांचे आई-वडील आणि मित्रमंडळी कोण आहेत, याची त्यांना माहिती मिळेल.

पुढील पत्त्यावर आपली मते कळवा:

प्रगती प्रकाशन, १७ झुबोवस्की बुलेवार्द, मॉस्को, सोविएत संघ.

